**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः एएससी १५०७/प्र.क्र.१५०/०७/१४-अ**

हुतात्मा राजगुरू चौक,मंत्रालय,

मादाम कामा रोड, मुंबई ४०० ०३२

तारीख: ३० जुलै, २०१४

**वाचा :** १) सा.प्र.वि. चे आदेश क्र.एएससी १५०७/प्र.क्र.१५०/०७/१४-अ, दिनांक १६.७.२००९

२) सा.प्र.वि. चे आदेश क्र.एएससी १५०७/प्र.क्र.१५०/०७/१४-अ, दिनांक २०.३.२०१०

## आदेश

सदंर्भाधीन आदेश क्र.१ अन्वये श्रीमती नि.तु.चिकटे (अ.जा.) निम्नश्रेणी लघुलेखक (मराठी), पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना दि.१६.७.२००९ पासून उच्चश्रेणी लघुलेखक पदावर नियमित पदोन्नती देण्यात आली. त्यानंतर संदर्भाधीन क्र.२ च्या आदेशान्वये, त्यांना उच्चश्रेणी लघुलेखक पदावरील दिनांक १.११.२००७ हा सुधारित ज्येष्ठतेचा दिनांक देण्यात आला आहे.

२. आता श्रीमती चिकटे यांना निम्नश्रेणी लघुलेखक संवर्गात ज्येष्ठ असलेले श्री.रो.पुं.खळे (अ.जा.) निम्नश्रेणी लघुलेखक (मराठी), नगर विकास विभाग यांचा समावेश सन २००७-२००८ च्या उच्चश्रेणी लघुलेखकांच्या निवडसूचीत केल्यामुळे श्रीमती नि.तु.चिकटे यांचे नाव सदर निवडसूचीतून वगळण्यात येत आहे. त्यामुळे संदर्भाधीन क्र.१ व २ अन्वये श्रीमती नि.तु.चिकटे यांना उच्चश्रेणी लघुलेखक पदावर देण्यात आलेली नियमित पदोन्नती रद्द करण्यात येत आहे व श्रीमती नि.तु.चिकटे यांची पदोन्नती सरळसेवा कोटयातील अ.जा. प्रवर्गातील उच्चश्रेणी लघुलेखकाच्या रिक्त पदांवर अभावित समजण्यात येत आहे.

३. सन २००७-२००८ या निवडसूचीतून पात्र ठरलेले नगर विकास विभागातील श्री.रो.पुं.खळे (अ.जा.) निम्नश्रेणी लघुलेखक (मराठी) यांना उच्चश्रेणी लघुलेखक (मराठी) पदावर या आदेशाच्या दिनांकापासून तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. श्री.खळे यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना आदिवासी विकास विभागात करण्यात येत आहे. श्री.खळे यांना उच्चश्रेणी लघुलेखक पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक देण्याची कार्यवाही स्वतंत्ररित्या करण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३०१७१४०२१४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADIK SUCHITA M

Digitally signed by MAHADIK SUCHITA M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=MAHADIK SUCHITA M
Date: 2014.07.30 17:14:35 +05'30'

**(सुचिता मो. महाडिक)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

संबंधित उच्चश्रेणी लघुलेखक/निम्नश्रेणी लघुलेखक (संबंधित विभागामार्फत)

**प्रत,**

१) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग/ नगर विकास विभाग/ आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई (संबंधित विभागामार्फत)

२) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,

३) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

६) अवर सचिव (आस्थापना), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग/ नगर विकास विभाग/ आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई,

७) निवडनस्ती/संग्रहार्थ (साप्रवि/का.क्र.१४-अ)